**शिक्षक प्रशिक्षण या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील (दुसरा हप्ता) केंद्र व राज्य शासनाच्या अनुसूचित जाती उपयोजना (SCSP Head) लेखाशीर्षातून निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अनुवि- ४३१६/(८५/१६)/प्रशिक्षण**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२,
तारीख: १८ मार्च, २०१७

वाचा -

**मनुष्यबळ व विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ ४४-३०/२०१६-ईई-९, दिनांक ०६.०३.२०१७.**

प्रस्तावना -

केंद्र शासनाने सन २०१६-१७ पासून शिक्षक प्रशिक्षण (TEAB) या केंद्र पुरस्कृत योजनेचा केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ६०:४० असे निश्चित केले आहे. त्यानुसार केंद्र शासनाने सदर योजनेच्या अनुषंगाने अनुसूचित जाती उपयोजना (SCSP Head) या लेखाशीर्षातंर्गत दि.०६/०३/२०१७ च्या पत्रान्वये दुसरा हप्ता उपलब्ध करून दिला आहे. त्यानुसार सदर योजनेमध्ये उणे प्राधिकार उपलब्ध असल्याने, वेतनावर जादा खर्च झाल्याचे दिसून येते. त्याअनुषंगाने शिक्षक प्रशिक्षण या केंद्र पुरस्कृत योजनेकरिता अनुसूचित जाती उपयोजना (SCSP Head) या लेखाशीर्षातून सन-२०१६-१७ करिता केंद शासनाने उपलब्ध करुन दिलेला दुसऱ्या हप्त्याच्या निधीमधून वेतनावरील झालेला जादा खर्च समायोजित करुन उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शिक्षक प्रशिक्षण या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत अनुसूचित जाती उपयोजनेच्या (SCSP Head) लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाने दुसरा हप्ता (६०%) रु.७९.९२६ लाख वितरित केलेला आहे. केंद्र हिश्याच्या प्रमाणात राज्य हिस्सा (४०%) रु.५३.२८४ लाख इतका आहे. केंद्र हिस्सा रु.७९.९२६ लाख व राज्य हिस्सा रु.५३.२८४ लाख असा एकूण रु.१३३.२१ लाख इतक्या निधी मधून वेतनावरील उणे प्राधिकारान्वये केंद्र हिस्सा रु.७१.०५ लाख व राज्य हिस्सा रु.४७.३६ लाख असा एकूण रु.११८.४१ लाख निधी समायोजित करुन उर्वरित निधी खालील तक्त्यामध्ये दर्शविल्यानुसार वितरीत करण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| दुसरा हप्ता | केंद्र शासनाच्या पत्राच दिनांक | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकूण रुपये | उणे प्राधिकारान्वये वेतनावरील जादा खर्च-केंद्र/राज्य (समायोजित करावयाचा निधी) | वितरीत करावयाचा निधी (कॉलम ५-६) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| SCSP Head | दि.०६/०३/२०१७ | रु.७९.९२६ | रु.५३.२८४ | रु.१३३.२१ | रु.११८.४१ | रु.१४.८० |

केंद्र शासनाने दि.०६/०३/२०१७ च्या पत्रान्वये वितरीत केलेल्या रु.७९.९२६ लाख व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु.५३.२८४ लाख असा एकूण रु.१३३.२१ लाख इतक्या निधी मधून उणे प्राधिकारान्वये वेतनावर झालेला एकूण रु.११८.४१ जादा खर्च समायोजित करुन उर्वरित रु.१४.८० लाख (रुपये चौदा लाख ऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर खर्च -"मागणी क्र.ई-२ २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ८० - सर्वसाधारण,००३-प्रशिक्षण, (०१) शिक्षकांचे प्रशिक्षण, (०१)(०५) शिक्षक प्रशिक्षण (अनुसूचित जाती उप योजना) (केंद्र हिस्सा) (२२०२ ।०५८)" या लेखाशीर्षातून सन- २०१६-१७ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून करण्यात यावा

व "मागणी क्र.ई-२ २२०२ - सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण, ००३-प्रशिक्षण, (०१) शिक्षकांचे प्रशिक्षण,(०१)(०६) शिक्षक प्रशिक्षण (अनुसूचित जाती उप योजना) (राज्य हिस्सा)(२२०२ ।०६७)" या लेखाशीर्षातून सन- २०१६-१७ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून करण्यात यावा. तसेच, ज्या उद्दिष्टांसाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्दिष्टांसाठी खर्च करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.क्र.१२७/अर्थोपाय, दि.१४/३/२०१७ व दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकामधील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१८१६३३११३४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.03.18 16:36:03 +05'30'

( डॉ.सुवर्णा खरात )
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे
३. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
५. संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य पुणे
६. संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
५. सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
९. सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती.